Vol. 4 | 1st Jun, 2019 (Monthly) | **Price:** ₹100/- | **Total Pages:** 36

1 to 8 Years

# चिकूPiku.com

## Fun & Learning

आमराईची सर्वांना धमाल मजा येऊ दे,
आमरसाच्या नदीमध्ये चिंब-चिंब भिजू दे,
दाढी-मिशा आमरसाच्या, कुल्फी खातात सारी,
आंब्याच्या दिवसांची गंमतच भारी...

For Kids & Parents

Brain-based Nurturing for Early Childhood.
Stories & Activities in मराठी & English Languages.

# मुलांच्या मेंदूत डोकावूयात!



माणसांत एकूण ८ प्रकारच्या बुद्धिमत्ता असतात. प्रत्येकात या आठ बुद्धिमत्ता कमी–अधिक प्रमाणात असतात. आठपैकी किमान दोन ते तीन बुद्धिमत्ता प्राधान्याने असतात. चिकूपिकू मासिकातील नवी गोष्ट, नवा खेळ, नवी Activity मुलांच्या मेंदूतील न्युरॉन्सची जोडणी करत असते. चिकूपिकूचा प्रत्येक अंक मुलांच्या डोक्यात भरपूर आणि चांगल्या जोडण्या घडवून आणेल.



**1. Linguistic / Verbal Intelligence**

Narrating & Reading Stories



**2. Spatial Intelligence**

Art & Drawing Activities



**3. Interpersonal Intelligence**

Giving Opportunities to Express Thoughts



**4. Musical Intelligence**

Listening & Singing Poems





**5. Intra-Personal Intelligence**

Think & Explore the World



**6. Bodily-Kinesthetic Intelligence**

Enacting Poems and Stories



**7. Logical-Mathematical Intelligence**

Activities to Support Math & Logical Reasoning



**8. Naturalistic Intelligence**

Activities to Develop Sensitivity Towards Nature

ChikuPiku team of experts: **Dr. Shruti Panse** (Educationist) | **Abha Bhagwat** (Artist- Wall art painting)
**Dharmaraj Patil** (Ornithologist) | **Vaidehi Ashtaputre-Kulkarni** (Storyteller)
**Vaishali Karlekar** (Author) | An enthusiastic team of illustrators & artists

**Owned & Published by** OneZeroEight Learning Pvt. Ltd. | **Editor**: Dr. Shruti Panse
**Printed by** Atharva Print Creation, S. No. 91/1, Plot No. 8, Tulshibaugwale Colony, Sahakar Nagar, Pune 411 009
**Published at** Flat No. 10, Narayan Complex, 2nd Floor, Hingne Kh., Sinhgad Road, Pune 411 051





# प्रिय आई-बाबा,

एक लहानसं मूल घरात वाढवणं ही सोपी गोष्ट नसते. विशेषतः आपली नोकरी-व्यवसाय सांभाळून! मुलं नेहमी मजेत असतात. ती आपल्यासारखी थकत किंवा दमत नाहीत. सदैव खेळायला, मजा करायला, खदा-खदा हसायला ती नेहमी तयार असतात. आपली आणि त्यांची शारीरिक – मानसिक ऊर्जा कधीच जुळत नाही.



मुलांबरोबर थोडा वेळ खेळलं, ते म्हणतील तसं केलं तर आपल्याला काही वेळ आपला थकवा जाणवतही नाही. आणि ताण-तणाव? ते तर या काळात कुठल्याकुठे पळून गेलेले असतात! मुलांचा गोड आवाज (अगदी रडतानासुध्दा), त्यांच्या निरागस मागण्या, घोडा-घोडा आणि भाजी घ्या भाजी सारखे खेळ पुन्हा नाही खेळणार आपण कधी! आत्ताच ती मज्जा करून घ्या! करून तर बघा...



डॉ. श्रुती पानसे
Editor - ChikuPiku
Ph.D. (Brain-based Learning)
**Educationist | Consultant | Child Psychologist**
**www.shrutipanse.com**

# फिशिरा


Audio story available on www.chikupiku/audio

फिशिराला खूप भूक लागली होती.
त्यात तिला आईपण दिसत नव्हती.
आईची वाट पाहून आता तिला भूक
असह्य झाली होती.



आई, मला खूप भूक लागलीये.
कुठे आहेस गं तू?
आई इतकी लांब-लांब का बरं जाते?
कशाला एवढं पोहायचं?
इकडे मला भूक लागलीये.

आज ती काय आणेल माझ्यासाठी?
छोटीशी मासोळी की किडा?
मला ना हे सगळं आवडतं.


Linguistic / Verbal Intelligence



(तेवढ्यात फिशिराचा मित्र चंकी तिथे येतो.)
अगं, तू इथे एकटीच का थांबली आहेस?
चल की खेळायला.



नाही यायचं मला खेळायला!
भूक लागलीये मला.

भूक लागलीये?
मग खा की काही तरी.
खूप पानं आहेत इकडे खायला!



मला ती पानं नकोयेत!
कंटाळा आलाय पानांचा!



बस मग तशीच!
(चंकी निघून जातो).

आई, तू कुठे गेली होतीस?
मला खूप भूक लागलीये.
काही आणलंस का माझ्यासाठी खायला?





मी काय आणणार तुला?
तुझं तू शोधायचं आणि खायचं!
जा ती पानं खा.

मला नकोयेत ती पानं.
मला अळी किंवा किडा खायचाय.
पानं खायचा कंटाळा येतो मला.



फिशिरा.. आपलं ठरलंय ना,
सगळं खायचं म्हणून.
त्याशिवाय शक्ती कशी येणार तुला?

शक्ती नसेल तर तू खेळणार कशी?
आणि मग त्या झिंगू माशाबरोबर
शर्यत कशी जिंकणार?
तुला माहितीये का, मी आणि बाबा
जेवणातल्या सगळ्या गोष्टी खातो
म्हणून आम्ही मोठे झालो.

**Parents Zone**

मुलांना चित्रांचा वापर करून गोष्ट सांगा.
**Audio Story** चा वापरसुद्धा करता येईल.
ऐकलेली गोष्ट मुलांना स्वतः सांगू द्या,
पण सक्ती न करता.

मला पण मोठं आणि
शक्तिवान व्हायचंय पण
आज मला अळी खायची होती.



आपण एक काम करूयात,
आत्ता ही पानं खाऊया म्हणजे
आपल्याला शक्ती येईल आणि
रात्री अळी किंवा किडा शोधून खाऊया.





चालेल. पण रात्री नक्की हं.

फिशिरा आणि आईने पोटभरून पानं खाल्ली.
रात्री फिशिराने स्वतः किडा शोधून खाल्ला.
आई आणि बाबांनी फिशिराला शाब्बासकी दिली.

– डॉ. श्रुती पानसे

## या चित्रात S शोध आणि त्यावर पेन्सिलने गिरव!








हे बघ S पासून काढलेलं बदक.
तू पण S पासून इथे एखादं चित्र काढून बघ!





# चिऊ...चिऊ...चिमणी...

मी आहे चिऊताई. मी या घराच्या वळचणीत घरटं तयार केलंय. माझ्या दोन पिल्लांबरोबर मी या घरट्यात राहते.

शेजारच्या आजीबाईंनी काल गहू पाखडले, त्याची तुसं मी पिल्लांना भरवली.

कधी-कधी आम्ही छोटे किडे खातो, कधी वाळवणासाठी ठेवलेलं धान्य, तर कधी भाताची शितं. पण आजकाल सिमेंटच्या घरांमुळे घरटं करायला जागाच सापडत नाही आणि खाऊसुद्धा शोधता येत नाही. त्यामुळे आम्हा चिमण्यांची संख्या कमी झाली आहे.


Naturalistic Intelligence

# चला मोजूया!

या चार चिमण्यांच्या मिळून एकूण किती चोची आहेत?






Logical-Mathematical Intelligence






**Linguistic / Verbal Intelligence**

उन्हाळ्याचे दिवस होते. बाहेर खूप ऊन पडलं होतं आणि खूप उकडत होतं. उन्हामुळे सगळे त्रस्त झाले होते.







मला खूप म्हणजे खूपच तहान लागलीये रे.
आपण पाहूया कुठे पाणी मिळतेय का?





हो, चल.
(मग दोघे पाणी शोधायला निघतात.)

एका घराच्या कुंडीतून थोडं पाणी ठिबकत असतं.



पिकू थोडं पाणी पिते. पण तिला अजून तहान लागलेली असते.

**Parents Zone**

गोष्टी सांगून आणि ऐकून मुलांचा शब्दसंग्रह वाढतो. मुलांना सांगता येईल की, प्राण्यांनासुद्धा तहान लागते. घराच्या बाहेर / खिडकीत पक्ष्यांसाठी एखाद्या भांड्यात पाणीसुद्धा ठेवता येईल.

तेवढ्यात एक छोटा मुलगा त्याच्या आईबरोबर वॉटरबॅगमधून पाणी पीत चाललेला असतो. पिकू त्याच्याकडे बघून ओरडते. ते ऐकल्यावर तो मुलगा म्हणतो,





आई, हिला तहान लागली असेल का गं?
मी तिला पाणी देऊ का थोडं?

हो... दे की. बिचारीला खूप तहान लागली असेल. ऊन ही खूप आहे ना?





मग तो वॉटरबॅगच्या झाकणातून तिला पाणी देतो. पिकू पाणी पिते. तरीही तिला अजून तहान लागलेली असते.

थोडं पुढे गेल्यावर त्यांना एक नळ दिसतो, त्यातून थोडं पाणी ठिबकत असतं.





पिकू थोडं पाणी प्यायचा प्रयत्न करते. पण तिला खूप थोडं पाणी पिता येतं. चिकूला पण पाणी हवं असतं. त्याला ते थेंब-थेंब पडणारं पाणी नीट पिताच येत नाही.

तेवढ्यात चिकूला तिथे एक भांडं पडलेलं दिसतं. तो ते भांडं तोंडात धरून आणतो. आणि ते भांडं नळाखाली ठेवतो. हळूहळू त्या भांड्यात पाणी साठतं.

भांडं पाण्याने भरल्यावर ते दोघेही मनसोक्त पाणी पितात. एवढ्यात बाकीचे पक्षी पण तिथे येतात. सर्वांची पाणी पिण्यासाठी झुंबड उडते.



- वैशाली कार्लेकर

# ५ फरक ओळख





या चित्रातील लोकं एकमेकांशी काय बोलत असतील बरं?



फल ले लो... फल ले लो... ताजे-ताजे फल ले लो...
सेब ले लो लाल-लाल... आम भी हैं बड़े कमाल....
मीठे अंगूर धों के खाएं... तरबूजे का रस बनाएं...

# ठिपके जोडून चित्र काढ!



Visual / Spatial Intelligence



# Trace and Color

हे चित्र आम्हाला Whatsapp वर पाठवा.

91721 36478

# Nature and मी

Dharmaraj Patil
(Ornithologist / Wildlife Researcher)


Naturalistic Intelligence

आपले डोळे एकाच बाजूला आणि शेजारी-शेजारी आहेत त्यामुळे आपल्याला सगळ्या गोष्टी 3D दिसतात.

माझे डोळे दोन वेगवेगळ्या बाजूला आहेत. तुझ्यासारखी मला एखादी वस्तू एकाच वेळेस दोन्ही डोळ्यांनी दिसत नाही. माझ्या उजवीकडे जर झाड असेल तर ते फक्त उजव्या डोळ्यानेच मला दिसतं. म्हणजेच मला गोष्टी 2D दिसतात.



वाघ आणि मांजरांना आपल्यासारखे सगळे रंग दिसत नाहीत. त्यांना काळ्या, राखाडी आणि निळ्या रंगाच्या काही छटा दिसतात. त्यामुळे आपल्याला जंगल हिरव्या रंगाचं दिसतं ते वाघाला कदाचित **black and white** दिसत असावं.

**Parents Zone**

This segment is created to develop sensitivity of children towards nature, children will compare themselves with other animals.



**B**ats are not blind and can see quite well using their eyes. However, bats use **echolocation** technics to hunt in the dark. The bats emit ultrasonic sounds. These sounds hit various obstacles and return to the bat as an eco.



**O**wl is the only bird that has a forward facing eyes. Just like humans, the owl can see objects in three dimensions (3D). The owl's eyes are 15% stronger than human's eyes. Owl's eyes are large Owls eyes are large and so well developed that it can see and hunt during the night.

# चिंगूमुंगी

Visual/Spatial Intelligence

चिंगु -

केक -

वारुळ -

ही आहे मुंगी. तिच्या मै

मागे-मागे जाते. ला बागेत पडलेल्या

चा एक तुकडा दिसतो.

कत्र मिळून तो चा तुकडा उचलून

त घेऊन जातात. सगळ्या मुंग्या मिळू



आम्ही खूप शक्तिवान आहोत. आमच्या वजनाच्या ५० पट वजन आम्ही उचलू शकतो. एका वारुळात आम्ही हजारो मुंग्या एकत्र मजेत राहतो.

Parents Zone

गोष्टीतली चिंगू, केक आणि वारुळ हि चित्रे मुलांना दाखवा गोष्ट सांगताना, प्रत्येक वेळेस जेव्हा चित्र येईल तेव्हा त्याचं नाव काय? ते मुलांना सांगू दे.

त्रिणींबरोबर एका त रहाते. एकदा ला

कसलातरी मस्त, गोड वास येतो. त्या वासाच्या

एकटीच तो खात नाही. लगेच तून

तिच्या मैत्रिणींना बोलावून आणते. मग सगळ्या मुंग्या ए

न केकची मस्त पार्टी करतात.

आम्हाला कान नसतात, जमिनीवरच्या कंपनांवरून आम्ही आजू-बाजूचा अंदाज घेतो. वासावरून आम्ही अन्न शोधतो आणि धोकासुध्दा. आम्ही छोट्याश्या फटीतून सहज आत शिरू शकतो.

# Curious CUBO


Audio story available on www.chikupiku/audio

Cubo often helps his mother in cooking. One day his mother was making chapatis. She mixed some water and wheat flour together. She kneaded a nice smooth dough. Then Cubo and his mother made small balls out of the dough. Cubo's mother rolled a nice and round chapati and put it on the pan. The chapati swelled up.

Aai, why does chapati swelled up?

The dough of chapati has water. When we put the chapati on a heated pan, the water converts to steam & tries to escape. While doing so, the steam lifts up the upper layer of the dough.


Ohhh. That's why it puffs up.


Yes Cubo, that is how it cooks.



But Aai some chapatis do not swell fully. Does that mean they are uncooked?
No Cubo. It just means that all the steam escapes from a small section, rather than the surface area. But the chapatis are cooked well.

Now would you like to have a delicious roll of chapatti with sugar and ghee?

Yes, Sure I would love to have one.



**Parents Zone**

Children are curious. We need to give them logical answers to boost their curiosity.

# सांग वरं?

कुकरची शिट्टी
कोण वाजवतं?





गाडीच्या टायरमध्ये
काय भरलेलं असतं?

खाऊचा वास
नाकापर्यंत कसा येतो?





वाढदिवसाला केकवरची
मेणबत्ती कशाने विझते?

हॅलो, या सगळ्या गोष्टी मी करतो.
तुम्ही मला हवा किंवा वारा म्हणता.
मी दिसत नाही पण तुझ्या त्वचेला जाणवतो.
हातावर फुंकर मारून बघ बरं!

अजून कुठे-कुठे हवा असते? आई-बाबा किंवा आजी-आजोबांना सांग.

**Parents Zone**

ही activity मुलांशी गप्पा मारत करता येईल. प्रत्येक प्रश्नाचं उत्तर लगेच देऊ नका. सगळे प्रश्न विचारून झाल्यावर हवेची concept चांगल्या प्रकारे सांगता येईल.

 Intra-Personal Intelligence




## आकाशातले काही ढग पांढरे तर काही ढग काळे असे वेगळ्या रंगाचे का असतात ?

(हा प्रश्न मुलांना विचारा)

(कधी मोकळ्या आकाशाखाली मुलांबरोबर असाल, तेव्हा असे प्रश्न मुलांना विचारा. बरोबर उत्तराची अपेक्षा नाही, पण यामुळे आपण विचारांना चालना देऊ शकतो.)

कर पाहू विचार आणि
पहा तुला उत्तर सापडतंय का ?

असं सगळे म्हणतात की
काळे ढग पाऊस आणतात.

तर मग पांढऱ्या ढगांमध्ये
पाऊस नसतो का ?




**उत्तर** – सूर्याचे किरण ढगांमधून पार होऊन आपल्यापर्यंत पोहोचतात. जेव्हा ते पांढऱ्या ढगांवर पडतात तेव्हा ते परावर्तित (Reflect) होऊन आपल्या डोळ्यांपर्यंत पोहोचतात. या सूर्यकिरणांमध्ये वेगवेगळे रंग असतात. ते रंग एकत्र आपल्या डोळ्याच्या पडद्यावर उमटतात पण त्या सगळ्या रंगांचा एकच पांढरा रंग आपल्या डोळ्याला दिसतो म्हणून आपल्याला ते ढग पांढरे दिसतात. काळ्या ढगांमध्ये पाणी असतं, त्या पाण्यातून हे किरण इतस्तत: विखुरले जातात व आपल्या डोळ्यांपर्यंत पोहोचू शकत नाहीत आणि म्हणून ते ढग आपल्याला काळे दिसतात.



# How to Draw a Snail?

 Visual/Spatial Intelligence



















Now follow the above steps to draw the turtle.

| | | |
|---|---|---|
| 1 | 2 | 3 |
| 4 | 5 | 6 |





Audio story available on www.chikupiku/audio

आपण मागच्या गोष्टीत बघितलं की छबीची अंधाराची भीती घालवण्यासाठी बागुलबुवा छबीला जादूच्या पिशवीत घेऊन जातो. छबी अंधारातल्या गमती-जमती बघते आणि तिची अंधाराची भीती पळून जाते. पण, आपण या गोष्टीत बघूया की जादूच्या पिशवीबाहेरच्या अंधारात काय गंमत घडणार आहे.

एके दिवशी छबी आणि छबीची आजी बागेतून घरी येतात आणि बघतात तर काय? सगळीकडचे दिवे गेलेले होते. सगळीकडे अंधार झाला होता. घराचं कुलूप कसंबसं उघडत आजी म्हणाली, अरे देवा! घरीतर मेणबत्या नाहीयेत, काय करावं? छबी पटकन म्हणते, आजी तू शेजारच्या काकूंकडून मेणबत्ती घेऊन ये. तोपर्यंत मी घरातल्या खिडक्या उघडते. आजी म्हणते किती गं शूर माझी छबी आणि आजी मेणबत्ती आणायला जाते.

छबीला मात्र आता आजी गेल्यावर खूप भीती वाटायला लागते आणि ती म्हणते, बागुलबुवाच्या जादूच्या पिशवीतल्या अंधारात मजा येत होती पण आता इकडच्या अंधारात मला परत भीती वाटतीये. काय करू मी आता? घरात तर किती अंधार आहे. छबी एकटीच आत जायचा खूप प्रयत्न करते. पण दारापर्यंत जाऊन पुन्हा बाहेर येत असते.

तेवढ्यात छबीच्या घरावरून जाणारा बागुलबुवा विचारतो, काय छबुताई, काय आत-बाहेर चाललंय?

छबी म्हणते अरेऽऽऽ बागुलबुवा बर झालं तू आलास. जादूच्या पिशवीतल्या अंधारात किती गमती-जमती होत्या; पण आता इकडच्या अंधारात खूप भीती वाटतीये मला. तुझ्या जादूच्या पिशवीत दिवा असेल तर दे ना मला.

बागुलबुवा म्हणतो, अरेऽऽऽ आज जादूची पिशवी तर मी घरी विसरलो, पण इकडच्या अंधारात घाबरायचं नाही. इकडच्या अंधाराची गम्मत सांगतो. ऐक हं! तुला माहितीच आहे, भोपळ्यातल्या गोष्टीतली म्हातारी कशी शूर होती ते, भोपळ्यात बसून टुणूक टुणूक उड्या मारत जंगलातून धूम पळून घरी पोहोचली. तीनेही एक गाणं म्हटलं होतं. आठवतंय ना?

छबी म्हणते होऽऽऽ चल रे भोपळ्या टुणूक टुणूक.

बागुलबुवा म्हणतो, मग आता एक नवीन गाणं शिकवतो तुला. ते म्हणत हळूहळू आत जा.



Emotional Intelligence



मग छबी गाणं म्हणत हळू-हळू आत जाते.

**अंधारा-अंधारा भिणार नाही तुला,**
**बागुलबुवा म्हणलाय शूर मला.**
**हळू-हळू चालायचं अंधारात,**
**बसून घ्यायचं पटकन जागा मिळताच.**



छबी खिडक्या उघडते. थोडासा उजेड घरात येतो. ती पटकन खुर्चीवर बसते. तेवढ्यात आजी येते आणि अंधारात बसलेल्या छबीसाठी टाळ्या वाजवते. बागुलबुवा आजीला घडलेलं सगळं सांगतो.

**बागुलबुवा, मला तुम्ही अंधारातल्या गमती-जमती दाखवल्या, अंधारात शूर राहायचं गाणं शिकवलं; आता मी कधीच अंधाराला घाबरणार नाही. माझी भीती धूम पळाली.**



पुढच्या गोष्टीत बघूया
छबीला जादूच्या पिशवीत काय सापडतंय ते!

– वैदेही अष्टपुत्रे-कुलकर्णी

**Parents Zone**

अंधारा-अंधारा या ओळी मुलांकडून पाठ करुन घ्या.
भीती वाटेल तेव्हा त्या ओळी म्हणायला सांगा.

## Can you spot these objects?

(1) A small hut (2) Coconuts (3) A sand castle (4) A ball
(5) A puppy (6) A ship (7) A yellow bird (8) A flag

# SPOT SPOT



Logical intelligence



# चिमणी चित्र



- आभा भागवत



## पालकांसाठी



### आवर्जून काय कराल

बाथरूममध्ये चित्रं काढताना मुलं केवढी आनंदून जातात याचं निरीक्षण करा. हवा तितका वेळ मुलांना चित्रं काढू द्या.



### काय करू नका

मुलांनी काय काढायचं हे तुम्ही ठरवू नका. मुलांना प्रयोग करू दे. आपण फक्त कौतुक करायचं आणि प्रोत्साहन द्यायचं.
टाईल्स रंगवताना अंगावर रंगवलं तरी रंगवू दे, रागावू नका.

आपली चित्रकला ही आज लहानशा कागदावर अडकलेली आहे. चित्र म्हटलं की कागद आणि पेन्सिलच डोळ्यासमोर येतं. मोठे पृष्ठभाग - जसं भिंती, टाईल्स, जमीन, रस्ते, मोठ्ठे कागद आणि साधे रंग - जसं घरी केलेले भाज्यांचे रंग किंवा मातीपासून केलेला रंग, रंगपंचमीचे शिल्लक राहिलेले रंग, रांगोळीचे रंग किंवा बाजारात मिळणारे पाण्यातले रंग, हे मुलांनी चित्रं काढण्यासाठी वापरले पाहिजेत. छोटी मुलं खरं तर संपूर्ण शरीर वापरून चित्रं काढू शकतात. आपण विचारही करू शकणार नाही अशा गोष्टींमध्ये मुलांना चित्रं सापडतात. आपण एवढंच करायचंय की माध्यमांचं वैविध्य मुलांना अनुभवू द्यायचंय.

बाथरूममध्ये रंगात खेळायला मिळणं हे ८व्या ९ व्या वर्षापर्यंतच्या मुलांना खूपच आवडतं. अगदी छोटी ३-४ वर्षापर्यंतची मुलं तर अंघोळीच्या निमित्ताने पाण्यात जास्त खेळतात. त्यांचा पाण्याचा आनंद द्विगुणित करण्यासाठी, अंघोळीचा छोटासा टब घ्यावा आणि त्यात रंग घालावेत. रंगांचं मिश्रण मुलांना करू द्यावं आणि त्यातून नव्या रंगांची जादू अनुभवू द्यावी.










Visual/Spatial Intelligence

पोस्टर कलर्स पाण्यात मिसळून मोठ्या ब्रशने मुलांना बाथरूममधील टाईल्सवर चित्रं काढू द्यावीत. यात मुलं खूप वेळ छान रमतात आणि सफाईचं काम सोपं होतं. थोडं पाणी टाकलं, घासलं की बाथरूम साफ. हेच जर खोलीमध्ये करायला गेलं तर खूप जास्त पसारा होतो, तो बाथरूममुळे आवरायला सोपा जातो. प्रक्रियेच्या आनंदातून अभिव्यक्त होणं हे मुलांना समाधानी आणि शांत करतं.









## मुलांसोबत ही Activity करून पहा!

साहित्य- पोस्टर कलर्सपैकी कुठलाही रंग, अंघोळीचं भांडं, मोठ्ठा ब्रश, पाणी.

काय करायचं- अंघोळीच्या भांड्यात थोडं पाणी आणि थोडा रंग एकत्र कर. आपल्या बाथरूममध्ये टाईल्स लावलेल्या असतात, त्या टाईल्सवर मोठ्या ब्रशने हवी ती चित्रं काढ.



तयार केलेली चित्रं आम्हाला Whatsapp वर पाठवा. | 91721 36478

# मला हवा ऊस


Musical Intelligence



शेतातला ऊस, उसाचे करवे
चवीला गोड, खायचे असतात...



उसाच्या रसाची, ओठांवर मिशी
आली तरी रस, प्यायचा असतो



उसाचा रस, रसाचा गूळ
थोडासा रोज, खायचा असतो..



उसाचा रस, रसाची काकवी
पोळीला लावून, खायची असते...



उसाचा रस, रसाची साखर
आवडते खूप, पण जास्त खायची नसते!

**Parents Zone**

कवितेची एक ओळ तुम्ही म्हणा आणि
तुमच्या मागून मुलांना म्हणायला सांगा.



Hi, I am Sonu. I like eating Sugarcane. My Ajoba cuts it into small pieces & then I chew them. I also love to drink sugarcane juice.

- When I drink sugarcane juice, I get instant energy due to Glucose.
- It strengthens my bones and teeth by providing Calcium.
- Sugarcane juice is also good for digestion.
- It also has Magnesium, Potassium, Iron, and Manganese.

**Parents Zone**

Drink fresh sugarcane juice with kids & explain how it is healthy.

Today, Sonu is helping his mother in the kitchen. Can you help him, to match the given objects with their shadows?



Visual/Spatial Intelligence



# आकार शोध आणि रंगव.





**Parents Zone**

वेगवेगळे आकार मुलांना शोधून रंगवू द्या.


Visual/Spatial Intelligence

हे चित्र आम्हाला Whatsapp वर पाठवा.


91721 36478

# My Corner




शर्विल हा हेमलकसा, आनंदवन येथील डॉ. शीतल आमटे - गौतम करजगी यांचा मुलगा. तो वयाच्या दीड वर्षापासून acrylic paints ने चित्रं रंगवू लागला. आभा भागवत यांच्या चित्रांतून प्रेरणा घेऊन त्याच्या आई-बाबांनी त्याला सरळ कॅनव्हास हातात दिला. प्रथम बोटांनी चित्र-विचित्र आकार रंगवता-रंगवता पुढे पेंटिंग हा त्याचा नेहमीचा खेळ झाला. आता तो पाच वर्षांचा आहे आणि पेन्सिलीशिवाय हाताच्या बोटांनी, नाईफ वापरून, रंग ओतून, पानांचे ठसे तसेच stencils घेऊन विविध पध्दतीने पेंटिंग्स करतो. (याशिवाय शर्विल काय-काय करतो ते वेबसाईटवर बघा.) (www.chikupiku.com/blog/)

## शर्विलने काढलेली काही पेंटिंग्ज









1st June, 2019 (Monthly) | Price: ₹100/-
RNI TC No. MAHBIL10083

## आंब्यात कसा-कसा बदल होत गेला ते बघ...

मोहोरापासून आंबा तयार व्हायला ४ ते ५ महिने लागतात.













